**श्री गजानन महाराज संस्थान द्वारा संचलित श्री गजानन महाराज निवासी मतिमंद विद्यालय, शेगांव, जि.बुलडाणा ही बंद पडलेली अनुदानीत मतिमंद मुलांची विशेष शाळा अविष्कार, सांसकृतिक सामाजिक व अपंग विकास संस्था, नागपूर या संस्थेला हस्तांतरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: इडीडी २०१७/प्र.क्र.२००/ अ.क.१**
**मंत्रालय, मुंबई -४०००३२.**
**दिनांक : ६ जुलै, २०१७.**

**वाचा** :-१) शासन निर्णय समाज कल्याण व सांस्कृतिक कार्य विभाग क्र.इडीडी २००१/ प्र.क्र.५०२/सुधार-२, दि.१९.७.२००३ व समक्रमांकित शासन पुरकपत्र दि.४.१२.०३.
२) आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांचे क्र.अकआ/प्र-४/मति/गजानन शेगाव/हस्तांतर/ २०१७-१८ /१, दि.३.६.२०१७.
४) शासन निर्णय क्र.इडीडी २०१३/प्र.क्र.३५०/अ.क.१, दि.२४.१.२०१४.
३) मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल करण्यात आलेली रिट याचिका क्र.९४९/२०१२, मध्ये दि. ११.१०.२०१२ चे न्यायालयाचे आदेश.

**प्रस्तावना :-**

श्री गजानन महाराज संस्थान द्वारा संचलित श्री गजानन महाराज निवासी मतिमंद विद्यालय, शेगांव, जि.बुलडाणा ही बंद पडलेली अनुदानीत मतिमंद प्रवर्गातील मुलांची विशेष शाळा अविष्कार, सांसकृतिक सामाजिक व अपंग विकास संस्था, नागपूर या संस्थेला हस्तांतरीत करण्याबाबतच्या प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** -

श्री गजानन महाराज संस्थान द्वारा संचलित श्री गजानन महाराज निवासी मतिमंद विद्यालय, शेगांव, जि.बुलडाणा ही ६० निवासी मान्य विद्यार्थी संख्येवरील अनुदानित शाळा सदर शाळेच्या व्यवस्थापनाने स्वत:हून न चालविण्याचा निर्णय घेतल्यामुळे ती शाळा बंद पडलेली आहे.

२. बुलडाणा जिल्हयात अनुदान तत्वावर मतिमंद प्रवर्गातील ही एकमेव निवासी शाळा असल्यामुळे सदर शाळेची आवश्यकता लक्षात घेऊन मतिमंद विद्यार्थ्याची शैक्षणिक गैरसोय दूर द्वावी याकरीता सामाजिक न्याय विभागाच्या दि.२४.१.२०१४ चा शासन निर्णय व मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचे रिट याचिका क्र.९४९/२०१२ मधील न्यायालयाने निर्देशास अनुसरुन आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांनी श्री गजानन महाराज मतिमंद विद्यालय, शेगांव, जि.बुलडाणा ही बंद पडलेली अनुदानीत मतिमंद प्रवर्गातील मुलांची विशेष शाळा हस्तांतरीत करण्याकरीता वृत्तपत्रात निवेदन प्रसिध्दीस देऊन पात्र स्वयंसेवी संस्थांकडून प्रस्ताव मागविण्यात आले होते. त्यानुषंगाने प्राप्त झालेल्या प्रस्तावांनुसार दि.३१.५.२०१७ रोजी आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांचे अध्यक्षतेखाली नियुक्त करण्यात आलेल्या निवड समितीसमोर प्रत्येक संस्थांच्या प्रतिनिधींना सादरीकरण करण्याची संधी देण्यात आली होती. त्यामध्ये अविष्कार, सांसकृतिक सामाजिक व अपंग विकास संस्था, नागपूर या संस्थेची प्रतवारी समाधानकारक असल्याने श्री गजानन महाराज संस्थान द्वारा संचलित श्री गजानन

महाराज निवासी मतिमंद विद्यालय, शेगांव, जि.बुलडाणा ही बंद पडलेली अनुदानीत मतिमंद प्रवर्गातील मुलांची विशेष शाळा अविष्कार, सांसकृतिक सामाजिक व अपंग विकास संस्था, नागपूर या संस्थेला खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून हस्तांतरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

<u>अटी व शर्ती</u>

१) सदरहू संस्थेने शाळा अपंग व्यक्ती (समान संधी हक्काचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियम १९९५ मधील तरतूदीनुसार शेगाव येथे सुरु करावी.

२) आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांनी सदरहू संस्थेची शाळा सुरु झाल्यानंतर तपासणी करुन संबंधीत संस्था अपंग व्यक्ती (समान संधी हक्काचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियम १९९५ मधील तरतूदीनुसार अनुज्ञाप्ती देण्यास पात्र असल्याची खात्री करुन अनुज्ञाप्ती द्यावी.

३) शासनाने वेळोवेळी विहीत केलेल्या अटी व शर्तीची सदरहू संस्थेस पूर्तता करणे बंधनकारक राहील.

४) वरीलप्रमाणे शासनाच्या आदेशाचे आणि अटी व शर्तीचे पालन न केल्यास संबंधीत संस्थेस हस्तांतर करण्यास दिलेली शाळेची मान्यता रद्द करण्यात येईल.

५) आयुक्त, अपंग कल्याण, पुणे तथा सक्षम प्राधिकारी यांनी अपंग व्यक्ती (समान संधी व हक्कांचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियम १९९५ मधील तरतूदीनुसार तसेच अपंग शाळा १९९७ च्या संहितेनुसार आणि शासनाने वेळोवेळी काढलेल्या स्थायी आदेशानुसार व मा.न्यायालयाचे काही आदेश /निर्णय असल्यास ते लक्षात घेऊन संस्थेस हस्तांतर करण्याबाबत योग्य ती कार्यवाही करावी.

६) या प्रकरणी हस्तांतर करण्यास काही अडचणी उद्भवल्यास आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांनी वस्तुस्थितीदर्शक अहवाल शासनास तात्काळ सादर करावा.

७) श्री गजानन महाराज संस्थान द्वारा संचलित श्री गजानन महाराज निवासी मतिमंद विद्यालय, शेगांव, जि.बुलडाणा या शाळेतील प्रशासकीय मान्यताप्राप्त कर्मचा-यांना नवीन संस्थेत प्राथम्याने सामावून घेण्यात यावे.

८) आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांनी मूळ संस्थेकडील आवश्यक कागदपत्र व साहित्य हस्तांतरीत करण्यात आलेल्या संस्थेस संपूर्द करावे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्राच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१७०७०६१५१९४७८०२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Manisha Y Kamte
Date: 2017.07.06 15:20:29 +05'30'

**( म. यु. कामटे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. मा.मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव

२. सचिव (सा.न्या.), मंत्रालय, मुंबई

३. आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
४. प्रादेशिक उपायुक्त समाज कल्याण विभाग, नागपूर / अमरावती
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर/ बुलडाणा
६. समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद,नागपूर/ बुलडाणा
७. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
८. जिल्हा कोषागार अधिकारी, बुलडाणा
९. अध्यक्ष/सचिव, श्री गजानन महाराज संस्थान द्वारा संचलित श्री गजानन महाराज निवासी
१०.मतिमंद विद्यालय, शेगांव, जि.बुलडाणा.
११.अध्यक्ष/सचिव, अविष्कार, सांसकृतिक सामाजिक व अपंग विकास संस्था, नागपूर
१२.निवडनस्ती, अपंग कल्याण-१.

*****